**विदर्भ विकास कार्यक्रम व विदर्भ विकास कार्यक्रम अंतर्गत गडचिरोली जिल्हयातील नक्षलग्रस्त भागासाठी विशेष उपाययोजना.**
**<u>सन २००९-२०१० ते २०११-२०१२</u>**
**आदिवासी उपयोजनेंतर्गत घेण्यांत आलेल्या योजनांबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विकास,**
शासन निर्णय क्रमांक:- टिएसपी-२०१०/प्र.क्र.१३१/का.६,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक :- १६ ऑगस्ट, २०१०

**वाचा :-** नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक विविका-२००९/प्र.क्र.१०२/का.१४१५, दिनांक ३ फेब्रुवारी, २०१०.

**शासन निर्णय** :- विदर्भ विकास कार्यक्रम २००९-१० ते २०११-१२ अंतर्गत अमरावती, यवतमाळ, वाशिम, अकोला, बुलढाणा, नागपूर, वर्धा, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर व गडचिरोली या जिल्हयांसाठी सन २००९-१० ते सन २०११-१२ या तीन वर्षात खालील योजनांसाठी रु. ३३९.०० कोटी विदर्भ विकास कार्यक्रमासाठी व गडचिरोली जिल्हयातील नक्षलग्रस्त भागासाठी विशेष उपाययोजना सन २००९-२०१० ते २०११-१२ या तीन वर्षात खालील योजनांसाठी रु. ३६.०० कोटी असे एकूण रु. ३७५.०० कोटी एवढी तरतूद मंजूर करण्यांत येत आहे. त्याचा योजनानिहाय व वर्षनिहाय तपशील खालीलप्रमाणे आहे :-

**<u>विदर्भ विकास कार्यक्रम सन २००९-१० ते २०११-१२</u>**

( रु. कोटीत )

| अ. क्र. | योजनेचे नांव | वर्ष | | | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| | | आदिवासी उपयोजना २००९-१० | आदिवासी उपयोजना २०१०-११ | आदिवासी उपयोजना २०११-१२ | आदिवासी उपयोजना २००९-१२ |
| १ | आदिवासी उपयोजनेतर्गत प्रत्येक तालुक्यात एकलव्य इंग्रजी माध्यमातील निवासी शाळा सुरु करणे. | २४.०० | ९०.०० | १००.०० | २१४.०० |
| २ | वन क्षेत्राच्या माध्यमातून आदिवासी लोकांना स्वयंरोजगार उपलब्ध होण्यासाठी बांबू लागवड, अगरबत्ती व मध निर्मिती करणे. | १०.०० | १०.०० | १०.०० | ३०.०० |
| ३ | वन्य प्राण्यापासून पिकाच्या संरक्षणासाठी सोलार कुंपन बांधणे. | ०.०० | ५.०० | १०.०० | १५.०० |
| ४ | पुढील दोन वर्षात विदर्भातील वसतिगृहांमध्ये ५००० इतकी क्षमता वाढ करणे. | ०.०० | १५.०० | १५.०० | ३०.०० |
| ५ | गडचिरोली व अमरावती जिल्हयातील भरतीपूर्व वन रक्षक प्रशिक्षण देणे. | १०.०० | २०.०० | २०.०० | ५०.०० |
| | **एकूण** | **४४.००** | **१४०.००** | **१५५.००** | **३३९.००** |

## विदर्भ विकास कार्यक्रम अंतर्गत गडचिरोली जिल्हयातील नक्षलग्रस्त भागासाठी विशेष उपाययोजना सन २००९-१० ते २०११-१२

( रु. कोटीत )

| अ. क्र. | योजनेचे नांव | वर्ष | | | एकूण आदिवासी उपयोजना २००९-१२ |
|---|---|---|---|---|---|
| | | आदिवासी उपयोजना २००९-१० | आदिवासी उपयोजना २०१०-११ | आदिवासी उपयोजना २०११-१२ | |
| १ | नक्षलग्रस्त भागामध्ये ३०,००० कुटुंबाचे उत्पन्न वाढविण्यासाठी उपाययोजना. | ५.०० | १०.०० | १५.०० | ३०.०० |
| २ | वन विभागात भरतीपूर्व प्रशिक्षण देण्याकरिता मार्गदर्शन केंद्र स्थापन करणे. | १.०० | १.०० | १.०० | ३.०० |
| ३ | पोलीस विभागात भरतीपूर्व प्रशिक्षण देण्याकरिता मार्गदर्शन केंद्र स्थापन करणे. | ०.५० | १.०० | १.०० | २.५० |
| ४ | आदिवासी विद्यार्थ्यांना परिक्षा किंवा मुलाखतीकरिता जाण्या-येण्याचा खर्च देणे/मार्गदर्शन देणे. | ०.१० | ०.२० | ०.२० | ०.५० |
| ५ | एकाधिकार योजनेस किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेमध्ये परावर्तीत करणे. | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| ६ | आदिवासींना सागवान वन विभागामार्फत विक्री करण्याचे बंधन शिथील करुन माफक दरावर खुल्या बाजारात विक्री करणे. | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | **एकूण** | **६.६०** | **१२.२०** | **१७.२०** | **३६.००** |

२. आदिवासी उप योजनेतंर्गत विदर्भ विकास कार्यक्रमासाठी व विदर्भ विकास कार्यक्रम अंतर्गत गडचिरोली जिल्हयातील नक्षलग्रस्त भागासाठी विशेष उपाय योजनांसाठी राज्य योजनेखाली वर नमूद केल्याप्रमाणे नियतव्यय उपलब्ध करुन देण्यांत आला असून सदर नियतव्यय ठोक स्वरुपात अर्थसंकल्पीत करण्यांत आला आहे. यास्तव विदर्भ विकास कार्यक्रमाखाली व विदर्भ विकास कार्यक्रम अंतर्गत गडचिरोली जिल्हयातील नक्षलग्रस्त भागासाठी विशेष उपाय. योजनांसाठी सन २०१०-२०११ या चालू आर्थिक वर्षाकरिता उपलब्ध करुन दिलेली तरतूद खर्च करण्यासाठी तसेच नवीन योजनेस मंजूरी देण्यासाठी प्रस्ताव तातडीने विभागास सादर करावा. तसेच सन २००९-१० करिता राखून ठेवलेला नियतव्यय व्यपगत झाला आहे. त्यामुळे सदर नियतव्यय आता उपलब्ध करुन देता येणार नाही.

३. वर नमूद केलेल्या योजना राबवितांना आदिवासी क्षेत्रातील लाभार्थ्यांना प्राथम्य देण्यांत यावे. सदर योजनेचा लाभ आदिवासी क्षेत्रातील आदिवासींना देण्यांत यावा. आदिवासी क्षेत्राबाहेरीत लोकांना या योजनांचा लाभ देण्यांत येणार नाही याची कृपया नोंद घ्यावी.

४. विदर्भ विकास कार्यक्रमातील व विदर्भ विकास कार्यक्रम अंतर्गत गडचिरोली जिल्हयातील नक्षलग्रस्त भागासाठी विशेष उपाय योजनांसाठी वर नमूद योजना राबवितांना खालीलप्रमाणे कार्यवाही करावी.

अ) आदिवासी उप योजनेतर्गत गावाची/वाडीची अडचण लक्षात घेऊन कामांचा प्राध्यान्यक्रम ठरविण्यांत यावा.

ब) यापूर्वी आदिवासी उपयोजनेतंर्गत ज्या गावांत/वाडीची अशी कामे झाली असल्यास

त्या गावात/वाडीत अशी कामे न घेता ज्या गावांत/वाडीत अशी कामे झाली नाहीत तेथे घेण्यांत यावीत.

क) अपूर्ण कामे प्राधान्याने पूर्ण करण्यांत यावीत.

ड) आयुक्त,आदिवासी विकास, नाशिक यांनी संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास यांचे कडून वरील योजनांचे प्रस्ताव प्राप्त करुन घेऊन सदर प्रस्तावांची छाननी करुन अंतिम प्रस्ताव तात्काळ मान्यतेसाठी आदिवासी विकास विभागाकडे पाठवावेत.

ई) सदर योजनांच्या अनुषंगाने संबंधित मंत्रालयीन विभागांनी प्रस्ताव प्राप्त करुन घेऊन प्रस्तावांची छाननी करुन अंतिम प्रस्ताव तात्काळ मान्यतेसाठी आदिवासी विभागाकडे पाठवावेत.

५. सदरचा शासन निर्णय शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा **संगणक सांकेतांक क्रमांक** २०१००८१६१८०५५३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपांल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सु.द.नाईक )
**कक्ष अधिकारी**

प्रति,

१) मा. मुख्यमंत्र्याचे सचिव,
२) मा.उपमुख्यमंत्र्याचे सचिव,
३) सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४) शासनाचे मुख्य सचिव,
५) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
६) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
७) विभागीय आयुक्त, नागपूर व अमरावती विभाग,
८) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
९) जिल्हाधिकारी, अमरावती, यवतमाळ, वाशिम, अकोला, बुलढाणा, नागपूर, वर्धा, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर व गडचिरोली.
१०) अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर व अमरावती.
११) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१३) निवड नस्ती ( का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.